**सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता वनतळी बांधणे (४४०६ ०७९७) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०२२/प्र.क्र.८७/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:-१५ मार्च, २०२३

वाचा:-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३,दि. ०४.०४.२०२२
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र /प्र.क्र. ३/०७९७/५१४/२०२२-२३, दि. १२.१२.२०२२
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य,नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/नबाप्र /प्र.क्र. ३/०७९७/५२९/२०२२-२३, दि. १५.१२.२०२२
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.३/०७९७/५७४/२०२२-२३, दि. २७.१२.२०२२
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य,नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/नबाप्र /प्र.क्र. ३/०७९७/६५३/२०२२-२३, दि. १९.०१.२०२३
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य,नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/नबाप्र /प्र.क्र. ३/०७९७/६८५/२०२२-२३, दि. ०२.०२.२०२३
७) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. ०८.०२.२०२३
८) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य,नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/नबाप्र /प्र.क्र.३/०७९७/७५७/२०२२-२३, दि. २०.०२.२०२३
९) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य,नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/नबाप्र /प्र.क्र.३/०७९७/८०९/२०२२-२३, दि. ०२.०३.२०२३
१०) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य,नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/ पी/यो/नबाप्र /प्र.क्र.३/०७९७/८२१/२०२२-२३, दि. ०३.०३.२०२३

**प्रस्तावना :-**

राज्याच्या एकूण भौगोलिक क्षेत्राच्या सुमारे २१ टक्के इतकेच भौगोलिक क्षेत्र हे वनक्षेत्र असून राष्ट्रीय वनधोरणानुसार एकूण भौगोलिक क्षेत्राच्या वनक्षेत्र हे किमान ३३ टक्के असणे आवश्यक आहे. महाराष्ट्र राज्यात कमी घनता असलेल्या वनक्षेत्रामध्ये घनता वाढविण्याच्या दृष्टीने परिणामकारण पाऊले जलद गतीने उचलण्याची गरज आहे. राज्यामध्ये ज्या वन क्षेत्रात पावसामुळे जमिनीची धुप मोठ्या प्रमाणात होते, त्या वन क्षेत्रामध्ये जमिनीची धुप रोखण्यासाठी पाण्याच्या प्रवाहाची गती रोखणे आवश्यक असून, भुगर्भातील पाण्याच्या पातळीमध्ये वाढ होण्याच्या दृष्टीने व सदर क्षेत्रामध्ये वृक्ष घनता वाढविण्यासाठी वन विभागातर्फे "**वनतळी बांधणे**" हा कार्यक्रम हाती घेतला आहे.

०२. वनतळे/सिमेंट बंधाऱ्याचे बांधकाम (४४०६ ०७९७) या योजनेंतर्गत सन २०२२-२३ या वर्षात रू.११००.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक

१ येथील नमूद परिपत्रकान्वये, वित्तीय वर्ष सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पीय तरतूदींची मासिक निधी विवरणपत्रे, अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०२२-२३ च्या प्रथम नऊमाहीकरिता (डिसेंबर, २०२२ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्याच्या अनुषंगाने सूचना देण्यात आलेल्या आहेत. तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक ७ येथील नमूद दिनांक ०८.०२.२०२३ रोजीच्या परिपत्रांन्वये वित्तीय वर्ष सन २०२२-२३ करीता आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्याच्या अनुषंगाने मर्यादा निश्चित करण्यात आलेल्या आहेत.

०३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भाधीन क्र. २ ते ६ व संदर्भाधीन क्र. ८ ते १० येथील पत्रान्वये सन २०२२-२३ करीता वनतळी बांधणे (४४०६ ०७९७) या योजनंतर्गत नाशिक, नागपूर, चंद्रपूर, पुणे, औरंगाबाद, धुळे, कोल्हापूर, गडचिरोली, ठाणे व औरंगाबाद या वनवृतामधील एकूण रु.१०५३.६१ लक्ष रकमेचे नवीन बाब प्रस्ताव शासनास सादर केलेले आहेत. सदर नवीन बाब प्रस्तावातील नमूद करण्यात आलेल्या कामांसाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय :-</u>

सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात वनतळे/सिमेंट बंधाऱ्याचे बांधकाम (४४०६ ०७९७) योजनेकरिता रु.११००.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सदर योजनेंतर्गत पुढीलप्रमाणे रु.९०४.४८ लक्ष (रुपये नऊ कोटी चार लक्ष अठ्ठेचाळीस हजार मात्र) एवढा निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| | | | | (रुपये लाखात) |
|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **वनवृत्त** | **वन विभाग** | **शासनास प्रस्तावांव्दारे मागणी केलेली रक्कम** | **वितरीत करावयाची रक्कम** |
| १ | नाशिक | अहमदनगर | ३१.६२ | ३१.६२ |
| | | मालेगाव | ५८.६७ | ५८.६७ |
| | | पुर्व भाग नाशिक | ५९.६८ | ५९.६८ |
| | | **एकूण** | **१४९.९७** | **१४९.९७** |
| २ | नागपूर | वर्धा | ३९.५९ | ३९.५९ |
| | | भंडारा | ५७.६९ | ५७.६९ |
| | | **एकूण** | **९७.२८** | **९७.२८** |
| ३ | चंद्रपूर | चंद्रपूर | ८२.०९ | ८२.०९ |
| | | ब्रम्हपूरी | ४८.८४ | ४८.८४ |
| | | **एकूण** | **१३०.९३** | **१३०.९३** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४ | पुणे | भोर | ६०.८३ | ६०.८३ |
| | | पुणे | ६१.८६ | ६१.८६ |
| | | **एकूण** | **१२२.६९** | **१२२.६९** |
| ५ | औरंगाबाद | हिंगोली | ५७.०० | ५७.०० |
| | | उस्मानाबाद | ३५.८२ | ३५.८२ |
| | | नांदेड | ३४.४७ | ३४.४७ |
| | | **एकूण** | **१२७.२९** | **१२७.२९** |
| ६ | धुळे | धुळे | ४३.१८ | ४३.१८ |
| | | नंदुरबार | ३९.९३ | ३९.९३ |
| | | यावल | ४८.८८ | ४८.८८ |
| | | **एकूण** | **१३१.९९** | **१३१.९९** |
| ७ | कोल्हापूर | सातारा | ९९.२४ | ९९.२४ |
| | | **एकूण** | **९९.२४** | **९९.२४** |
| ८ | गडचिरोली | गडचिरोली | ४५.०९ | ४५.०९ |
| | | **एकूण** | **४५.०९** | **४५.०९** |
| | | **एकूण एकंदर** | **९०४.४८** | **९०४.४८** |

०२. सदर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामांची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार, विहीत अटी व शर्तीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

**०३.** तसेच सदर योजनेंतर्गत ०२-मजूरी व २१- पुरवठा व सामुग्री असे दोन उद्दिष्ट उपलब्ध असून सदर उद्दिष्टांमध्ये अर्थसंकल्पीत तरतुदीप्रमाणे निधी वितरीत करतांना ८०% मजूरी व २०% पुरवठा व सामुग्री या उद्दिष्टांमध्ये निधी वितरीत करण्याबाबतची कार्यवाही नियंत्रक अधिकारी यांनी करावी.

०४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी वर्ष २०२२-२३ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करण्यात यावीत.

०५. सदर निधी वितरित करण्यापूर्वी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२२-२३ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

०६. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ व संदर्भाधीन क्रमांक ७ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

०७. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा/ झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

०८. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.सी-०७**
**४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च,**
**०१ वनीकरण, ७० वन दळणवळण व इमारती, पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना,**
**राज्य योजनेंतर्गत योजना (००)(०३) वनतळी बांधणे (४४०६ ०७९७).**
**०२- मजूरी व २१- पुरवठा व सामग्री**

०९. सदर शासन निर्णय, वित्त विभाग दिनांक ०४.०४.२०२२ व दिनांक ०८.०२.२०२३ रोजीच्या शासन परिपत्राकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र/२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३१६११३५३२८५१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INGALE VINAYAK BALASAHEB

Digitally signed by INGALE VINAYAK BALASAHEB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=4282a00b0a0507f339edd9409eebc43f466c57e6ec219f022cb4d8e9d79999ec, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B9DD74802C0E9E87CDD582D1AEA8DC4506C60DEA869DFE0B71557BF4A56623D7, cn=INGALE VINAYAK BALASAHEB
Date: 2023.03.16 11:40:03 +05'30'

**( विनायक बा. इंगळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

५. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)
६. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण (६ वृत्त)
७. उप वनसंरक्षक (प्रा) (सर्व)/विभागीय वन अधिकारी (प्रा)/उपविभागीय वन अधिकारी (प्रा)
८. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण (सर्व जिल्हे)
९. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
१२. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१३. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१४. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१६. उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१७. निवडनस्ती फ-११.